| | |
|---|---|
| Convertion in Regular Temparary Establishment:- Shri Navnath S. Kavde & Shri Suresh B. Dhoble working under Kukadi Project circle, Pune | कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदांचे अस्थायी आस्थापनेवरील पदांमध्ये रुपांतरण- **श्री. नवनाथ शंकर कवडे व श्री. सुरेश भाऊ ढोबळे कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे.** |

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. रुअआ - ०१११/ (८९/२०११)/आ(कामगार)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २२/९/२०११

**पहावे** :- १) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग रु.अ.आ.१५९६/२२८/ सेवा-५, दि.२४.४.२००१
२) अधीक्षक अभियंता, कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे, सिंचनभवन,पुणे यांचे पत्र जा. क्र. कुप्रमं/पशा/कार्यासन-६/१०५४/२०११ दिनाक १.३.२०११.

**प्रस्तावनाः**

कार्यकारी अभियंता, पिंपळगाव जोगे धरण विभाग, नारायणगाव येथे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावर कार्यरत असलेले श्री. नवनाथ शंकर कवडे, व श्री. सुरेश भाऊ ढोबळे यांची अधिक्षक अभियंता , कुकडी प्रकल्प मंडळ,. पुणे यांच्या नियंत्रणाखालील कुकडी पाटबंधारे प्रकल्प विभाग क्र ४, हांडे डिंभे वसाहत यांनी अनुक्रमे दि ११.८.१९८२ व दि १५.१०.१९८२ रोजी कार्यव्ययी आस्थापनेवर मिस्त्री म्हणून नियुक्ती केली होती. संबंधित कामगार अनुक्रमे दि २८.९.९८ व दि २२.११.९८ पर्यंत सलग कार्यव्ययी आस्थापनेवर मिस्त्री या पदावर कार्यरत होते. सर्वश्री. कवडे व ढोबळे हे अर्हता परिक्षा उत्तीर्ण झाल्यामुळे त्यांना अनुक्रमे दि २९.९.९८ व दि २३.११.९८ पासून स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या पदावर नियत अस्थायी आस्थापनेवर घेण्यात आले. सदर दोन्ही कामगार नियत अस्थायी आस्थापनेवर येईपर्यंतच्या कालावधीपर्यंत सलग कार्यव्ययी आस्थापनेवर कार्यरत असल्यामुळे त्यांची कार्यव्ययी आस्थापनेवरील सलग सेवा अनुक्रमे १९ व २० वर्षे इतकी झालेली आहे.त्यानुसार श्री. कवडे व श्री. ढोबळे यांना कालेलकर करारानुसार व दिद. २४.४.२००१ च्या शासन निर्णयानुसार रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्री. नवनाथ शंकर कवडे, व श्री. सुरेश भाऊ ढोबळे यांची नियुक्तीच्या दिनांकापासून म्हणजे अनुक्रमे दिनांक ११.८.८२ व दि १५.१०.८२ पासून एका वर्षाच्या कालावधीत एकूण २४० दिवस इतकी सेवा झाली आहे. शासन निर्णय दि २४.४.२००१ मधिल तरतुदीनुसार सर्वश्री. कवडे व ढोबळे यांना खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र | कर्मचाऱ्यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. नवनाथ शंकर कवडे | कार्यव्ययी | मिस्त्री ११.८.८७ | ११.८.८७ | मिस्त्री | रु.९५०-१५०० (जुनी ) रु.३०५०-४५९० (५ वा वेतन आयोग ) |
| २ | श्री. सुरेश भाऊ ढोबळे | कार्यव्ययी | मिस्त्री १५.१०.८७ | १५.१०.८७ | मिस्त्री | रु.९५०-१५०० (जुनी ) रु.३०५०-४५९० (५ वा वेतन आयोग ) |

३. सर्वश्री. कवडे व ढोबळे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

४. अधीक्षक अभियंता, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत नर्गमित करुन ते संबंधित कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे नांव , पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचाऱ्याच्या व्यक्तीशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचाऱ्याची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे शासन निर्णय दि. २४.४.२००१ सोबतच्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापटात

/सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत_शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचाऱ्यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचाऱ्यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

५. श्री. नवनाथ शंकर कवडे, व श्री. सुरेश भाऊ ढोबळे यांना मिस्त्रि पदावर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याने त्यांच्या मूळ ज्येष्ठता दिनांकात
बदल होणार नाही. तसेच संबंधित कर्मचारी यांना नियत अस्थायी आस्थापनेवर येईपर्यंत त्यांच्या कार्यव्ययी आस्थापनेवर कार्यरत असलेल्या कालावधीतील वेतनभत्याची थकबाकी अनुज्ञेय राहील. मात्र सदर थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारच्या व्याजाची भविष्यात मागणी करण्यात येणार नाही अशाप्रकारचे प्रतिज्ञापत्र संबंधित कर्मचा-यांकडून लिहून घेणे बंधनकारक राहील.

६. सदर कर्मचा-यावर वेतनापोटी होणारा खर्च सन २०११-१२ या आर्थीक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक कमांक २०११०९२२१४५४२९००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत: प्रपत्र ब

अ.अ.कोदे

**( अ. अ. कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १, मुंबई / महाराष्ट्र- २ नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र -१,मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर
अधिक्षक अभियंता , कुकडी प्रकल्प मंडळ, पुणे
कार्यकारी अभियंता, पिंपळगाव जोगे धरण विभाग, नारायणगाव